**राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत मंजूर केलीन तलाव प्रस्तावामधील मंजूर कामांच्या बदलाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रासयो-२०२३/प्र.क्र.५३/आस्थापना (अ)**
नवीन प्रशासन भवन, १५ वा मजला, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०२ मे, २०२३.

**संदर्भ :-** १) पर्यावरण विभाग विभाग शासन निर्णय क्र.इएनव्ही २००८/प्र.क्र.६९/तां.क.३, दि.२७.०८.२००८
२) पर्यावरण विभाग विभाग शासन निर्णय क्र.रासयो २०१८/प्र.क्र.२२५/तां.क.२, दि.२ फेब्रुवारी,२०१९
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रत्नागिरी यांच्याकडून दि.०५ मे,२०२२ रोजी प्राप्त प्रस्ताव.
४) दिनांक २७.०२.२०२३ रोजीच्या सुकाणू समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना -**

राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रत्नागिरी यांच्यामार्फत सादर **केलीन तलावाच्या** संवर्धन प्रस्तावास सुकाणू समितीने मान्यता दिलेली होती. संदर्भाधिन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये सदर तलाव संवर्धनाच्या रुपये १,००,००,०००/- इतक्या किमतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात आली तसेच प्रथम हप्त्यापोटी रुपये ४५,००,०००/- इतका निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रत्नागिरी यांना वितरित करण्यात आला होता.

आता, संदर्भ क्र. ३ अन्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रत्नागिरी यांनी प्रस्तावांतर्गत मंजूर कामांपैकी काही कामांमध्ये बचत होत असल्याने सदर बचतीची रक्कम प्रस्तावातील इतर मंजूर कामांसाठी खर्च करण्यास मान्यता मिळणेबाबत विनंती केली आहे. त्यानुसार सदर प्रस्ताव दि.२७.०२.२०२३ रोजी झालेल्या सुकाणू समितीसमोर ठेवण्यात आलेला आहे. सुकाणू समितीच्या निर्णयानुसार **केलीन तलावाच्या** प्रस्तावातील बदलास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रत्नागिरी यांच्यामार्फत सादर केलीन तलावाचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धनाच्या सुधारित प्रस्तावावर सुकाणू समितीच्या दि.२७.०२.२०२३ रोजीच्या बैठकीत चर्चा करण्यात आली. सदर बैठकीच्या इतिवृत्तातील निर्णयाच्या अधीन राहून केलीन तलाव संवर्धनाच्या प्रस्तावाची मूळ किंमत न बदलता तसेच प्रस्तावात समाविष्ट GST, Centage Charge, Contingencies, Laboratory Charge असे Charges च्या ऐवजी राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजनेच्या मार्गदर्शक तत्वांनुसार (NLCP Guidelines) ८ % Centage charge/Contingency Charge समाविष्ट करून मंजूर कामे राबविण्यास तसेच प्रस्तावांतर्गत मंजूर कामांपैकी काही कामांमध्ये बचत होत असल्यास सदर बचतीची रक्कम प्रस्तावातील इतर मंजूर कामांसाठी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्रक्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५०२१२०४२५६९०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2023.05.02 12:10:19 +05'30'

**( सु. कि. निकम ),**
**सह सचिव,पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज भवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री (पर्यावरण व वातावरणीय बदल ) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल), मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल, मंत्रालय, मुंबई.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रत्नागिरी.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा) १. महाराष्ट्र मुंबई-४०००२०
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई- ४०००२०
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा) २. महाराष्ट्र, नागपूर
१३. अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई-४०००५१.
१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१५. निवासी लेखाधिकारी, मुंबई
१६. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
१७. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधीलेखा, कोकण भवन, मुंबई
१८. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१९. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
२०. रोखशाखा, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. निवडनस्ती.